राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत विदर्भ व मराठवाडा विभागात दूध उत्पादन वाढीसाठी राबवावयाच्या विशेष प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी प्रदान करणे तसेच, सदर प्रकल्पास येणारा खर्च रु.१२८.२९ कोटी यास वित्तीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः- एमएलके-२०१७/प्र.क्र.११३/पदुम-४,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : २१ जुलै , २०१७.**

वाचा :- १) या विभागाचा शासन निर्णय क्रमांक एमएलके २०१६/प्र.क्र.२७/पदुम ८, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१६.
२) शासन निर्णय क्रमांक एमएलके २०१६/प्र.क्र.२७/पदुम ८,दि. २१ जानेवारी, २०१७.
३) शासन पूरक पत्र क्रमांक एमएलके २०१६/प्र.क्र.४६/पदुम ४,दि. ९ मे, २०१७.
४) राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांचे पत्र क्र.राकृवि-०३१७/प्र.क्र.१४/राकृवियो कक्ष दि.९ जून, २०१७ अन्वये दि. २५ मे, २०१७ रोजी पार पडलेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समिती सभेचे निर्गमित केलेले इतिवृत्त.
५) नियोजन विभागाचा शासन निर्णय क्र.डीसीटी-२३१६/प्र.क्र.१३३/का-१४१७, दि.५ डिसेंबर, २०१६
६) नियोजन विभागाचा शासन निर्णय क्र. क्र.डीसीटी-२३१६/प्र.क्र.१३३/का-१४१७, दि.३ मार्च, २०१७

**प्रस्तावना :**

राज्यातील विदर्भ व मराठवाडा विभागात दुग्धोत्पादन वाढविण्यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळाच्या सहकार्याने विशेष प्रकल्प राबविण्याच्या अनुषंगाने दि.२५.५.२०१७ रोजी पार पडलेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या सभेमध्ये या प्रकल्पास तत्वत: मान्यता (Partial Sanction) प्रदान करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने, खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत विदर्भ व मराठवाडा विभागात दुग्धोत्पादन वाढविण्यासाठी विशेष प्रकल्पाची अंमलबजावणी करणे या प्रकल्पास याद्वारे, शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तसेच, सदर प्रकल्पासाठी येणारा खर्च रु. १२८.२९ कोटी यास वित्तीय मान्यता देखील प्रदान करण्यात येत आहे. सदरचा प्रकल्प राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीच्या अधीन राहून, राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळाच्या सहकार्याने सन २०१७-१८ ते २०१९-२० या तीन वर्षाच्या कालावधीत राबविण्यात यावा.

सदर प्रकल्पांतर्गत समाविष्ट करण्यात आलेल्या खालील विविध बाबींवर खर्च करतांना केद्र शासनाने, राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत वैरण व पशुखाद्य या उप-अभियानांतर्गत विविध कार्यक्रमांसाठी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना विचारात घेऊन करण्यात यावा.

**प्रकल्पाचे आर्थिक निकष-** या प्रकल्पांतर्गत समविष्ट विविध घटक व त्यांच्या अंमलबजावणीसाठी निधी उपलब्धतेचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

**( रु. कोटी)**

| अ. क्र. | प्रकल्पांतर्गत बाब | प्रकल्पाची किंमत | | |
|---|---|---|---|---|
| | | राकृवियो हिस्सा | लाभार्थी हिस्सा | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | गुणवत्तापूर्ण पशुखाद्य व पशुखाद्य पुरके पुरवठा. | १६.२५ | ४८.७५ | ६५.०० |
| २ | वैरण विकास कार्यक्रम. | २६.१९ | १८.९६ | ४५.१५ |
| ३ | गावपातळीवर पशुवैद्यकीय सेवा. | १७.५४ | ०० | १७.५४ |
| | **एकूण** | **५९.९८** | **६७.७१** | **१२७.६९** |
| | **प्रशासकीय खर्च** | **०.५९९८** | **००** | **०.५९९८** |
| | **एकूण** | **६०.५७९८** | **६७.७१** | **१२८.२९** |

प्रकल्पांतर्गत “शेतकऱ्यांकडील गायी-म्हशींमध्ये कृत्रीम रेतनाच्या सुविधा शेतकऱ्यांच्या दारापर्यंत पोहोचवणे” ही बाब राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत “Improving A I Delivery System” या मंजूर प्रकल्पामधून राबविण्यात यावी.

सदरचा प्रकल्प विदर्भ विभागातील अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर तसेच, मराठवाडा विभागातील लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद या एकूण ११ जिल्हयांमधील ३,०२३ गावांमध्ये राबविण्यात यावा.

**थेट लाभ हस्तांतरण :-**

या प्रकल्पांतर्गत लाभार्थ्यांना देय असलेले अनुदान वस्तु स्वरूपात न देता, लाभार्थ्यांने वस्तु/वस्तुंची प्रत्यक्ष खरेदी केल्यानंतर त्याची पडताळणी व खात्री झाल्यानंतर अनुदान थेट लाभार्थ्याच्या बँक खात्यात जमा करण्यात यावे.

**प्रकल्पांतर्गत लाभार्थ्यांना द्यावयाच्या वस्तुंचे तांत्रिक निकष :-**

या प्रकल्पांतर्गत लाभार्थ्यांना द्यावयाच्या विविध वस्तुंचे तांत्रिक निकष, दर्जा व गुणवत्तेची मानके वाचा-७ येथील नमूद शासन निर्णयाद्वारे गठित करण्यात आलेल्या तांत्रिक विनिर्देश समितीमार्फत निश्चित करण्यात यावीत.

**प्रकल्पांतर्गत अनुदानावर पुरवठा करावयाच्या वस्तुंचे मानक मुल्य (कॉस्ट नॉर्म) ठरविणे :-**

या प्रकल्पांतर्गत पुरवठा करावयाच्या विविध वस्तुंची महत्तम अनुदानाची टक्केवारी विहीत करण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने अनुदान रकमेची परिगणना करण्यासाठी संबंधित वस्तुच्या उत्पादनावर छापण्यात आलेली कमाल विक्री किंमत (MRP) व प्रत्यक्ष विक्री किंमत यापैकी जी कमी असेल, ती ग्राह्य धरण्यात यावी. लाभार्थी ज्या डिलर / विक्रेत्याकडून वस्तु खरेदी करणार आहे, तो वैध डिलर परवानाधारक / विक्री परवानाधारक व दुकाने व आस्थापना अधिनियमाखालील वैध परवानाधारक असावा.

**प्रकल्पांतर्गत लाभार्थी निवड :-**

या प्रकल्पांतर्गत समाविष्ट गावांमधील राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ अधिनस्त मदर डेअरी फ्रुट अँड व्हेजिटेबल लि. च्या दुध संकलन मार्गावरील सभासद शेतक-यांना या प्रकल्पामध्ये प्राधान्य देण्यात यावे. या प्रकल्पांतर्गत लाभ घेण्यासाठी लाभार्थी शेतक-यांनी खालीलप्रमाणे कागदपत्रांच्या स्वयंसाक्षांकीत प्रती सादर करणे आवश्यक राहील.

अ) स्वत:च्या नावे असलेल्या शेतीच्या क्षेत्राचे सात / बारा व आठ - अ चे दाखले.

आ) लाभार्थी अनुसुचित जाती / जमाती या प्रवर्गातील असल्यास, त्याबाबत प्राधिकृत अधिका-यांने दिलेल्या वैध जात प्रमाणपत्राची प्रत.

इ) आधार ओळखपत्राची प्रत.

ई) अर्जदार शेतक-याने त्याचे बँकेतील खाते आधार क्रमांकाशी संलग्न करणे आवश्यक राहील. या करिता लाभार्थ्याने बँकेस दिलेल्या पत्राची व बँकेकडून मिळालेल्या पोहोच पावतीची प्रत.

**लाभार्थी निवड समिती :-**

या विशेष प्रकल्पांतर्गत पृष्ठ क्र.२ येथील कोष्टकात नमूद केलेल्या विविध घटकांसाठी लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे लाभार्थी निवड समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १. जिल्हाधिकारी | - अध्यक्ष |
| २. विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी, राज्यस्तर | - सदस्य |
| ३. प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास विभाग | - सदस्य |
| ४. जिल्हा महिला व बालकल्याण अधिकारी, राज्यस्तर | - सदस्य |
| ५. जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार अधिकारी | - सदस्य |
| ६. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त | - सदस्य |
| ७. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद | - सदस्य |
| ८. सहायक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त कार्यालय | -सदस्य सचिव |

जिल्हा स्तरावर संबधित जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त हे या प्रकल्पाचे अंमलबजावणी अधिकारी राहतील. सदर प्रकल्पाचे संनियंत्रण विभागीय स्तरावर संबधित विभागाचे प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन व राज्य स्तरावर आयुक्त पशुसंवर्धन व प्रकल्प संचालक हे करतील. सदरच्या प्रकल्पास आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान करावी.

हा प्रकल्प राबवून झाल्यानंतर आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रकल्पाची फलनिष्पत्ती त्यांच्या अभिप्रायासह शासनास सादर करावी.

या प्रकल्पांतर्गत उपलब्ध झालेला निधी व त्याचा विनियोग याबाबतचा हिशोब स्वंतत्रपणे विहीत लेखापध्दतीनुसार आयुक्त पशुसंवर्धन यांनी ठेवावा. तसेच, मंजूर व उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी विहीत कालमर्यादेत १०० टक्के खर्ची करुन, त्याबाबतचे विहीत प्रपत्रातील उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त पशुसंवर्धन यांनी शासनास सादर करावे. जेणेकरुन, ते सचिव (पदुम) यांचे प्रतिस्वाक्षरीने राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांचेकडे सादर करण्यात येईल.

सदरचा प्रकल्प राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दिनांक २५ मे, २०१७ रोजीच्या बैठकीतील निर्णय व राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सुचना तसेच, केंद्र शासनाने राष्ट्रीय पशुधन अभियानाच्या अंमलबजावणीकरीता निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन राबविण्यात यावा.

या प्रकल्पाचा समावेश संबधित जिल्हयाच्या जिल्हा कृषि आराखडयात (C-DAP) करण्यात येवून तसे, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष यांना आणि, या कार्यासनास कळविण्यात यावे.

केंद्र शासनाने विकसित केलेल्या RDMIS या प्रणालीवर या प्रकल्पाची माहिती भरण्यात यावी. तसेच, प्रकल्पाच्या आर्थिक खर्चाचा आणि भौतिक साध्याचा मासिक प्रगती अहवाल नियमितपणे शासनास सादर करावा.

प्रकल्प राबविताना त्याची अंमलबजावणी, सनियंत्रण आणि मुल्यमापन करणे याबाबत आवश्यक तो समन्वय अंमलबजावणी यंत्रणांनी आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी ठेवावा.

या प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीकरीता आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सुचना आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या स्तरावरुन सर्व संबंधितांना तात्काळ निर्गमित कराव्यात.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१७०७२११५१६१२८४०१ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Shri Ravindra
Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2017.07.21 15:13:51 +05'30'

**( रविंद्र गुरव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव.

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव.

३. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
५. प्रधान सचिव (कृषि व फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
६. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे ६७
७. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.
८. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, पुणे.
९. विभागीय आयुक्त, नागपुर, अमरावती व औरंगाबाद
१०. जिल्हाधिकारी, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला.
१३. क्षेत्रीय प्रमुख (पश्चिम विभाग), राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ, पश्चिम द्रुतगती महामार्ग, गोरेगाव (पू) मुंबई.
१४. उपसचिव, दुग्धव्यवसाय विकास, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१५. उपसचिव (राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षण), मुंबई / नागपूर.
१७. महाराष्ट्र राज्य सहकारी दूध संघ (महानंद), गोरेगाव (पू) मुंबई
१८. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, नागपुर, अमरावती, औरंगाबाद व लातुर विभाग.
१९. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, नागपूर, अमरावती, औरंगाबाद व लातूर विभाग.
२०. प्रकल्प संचालक, विदर्भ व मराठवाडा दुग्ध विकास प्रकल्प, द्वारा मदर डेअरी फ्रुट ॲन्ड व्हेजीटेबल लि. नागपूर, डेअरी प्लॅन्ट, तेलंगखेडी रोड, नागपूर.
२१. मदर डेअरी फ्रुट ॲन्ड व्हेजीटेबल लि. नागपूर, डेअरी प्लॅन्ट, तेलंगखेडी रोड, नागपूर.
२१. विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी (राज्यस्तर ), अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद
२२. प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास विभाग, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद
२३. जिल्हा महिला व बालकल्याण अधिकारी (राज्यस्तर), अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद
२४. जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार अधिकारी, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद
२५. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद
२६. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद
२७. जिल्हा दुग्ध विकास अधिकारी, अकोला, अमरावती, बुलडाणा, वर्धा, नागपूर, यवतमाळ, चंद्रपूर, लातूर, नांदेड, जालना व उस्मानाबाद
२८. निवड नस्ती पदुम ४ कार्यासन, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.